राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत राज्यातील २१० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः अंनिका-२०१७/अपदे/प्र.क्र.२६३ /आरोग्य-५
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २४ ऑक्टोंबर, २०१८

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४ ऑक्टोबर, २००४.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. टीईपी-२००२/प्र.क्र.१३/सेवा-३, दि. २१ जून, २००६.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१ दि.०६/०८/२००७.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः अंनिका/अपदे २०१२/प्र.क.१६८/आ-५ दि. १८ मे, २०१२.
५) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः अंनिका/अपदे २०१२/प्र.क.१७०/आ-५ दि. १८ मे, २०१२.
६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः अंनिका-२०१८/अपदे/प्र.क.३०/आ-५, दि. २८ मार्च, २०१८
७) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क.८/१६/आ.पु.क. दि. ०७ सप्टेंबर, २०१८
८) **सहसंचालक ,आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/अंनिका/**२१० **अ.पदे/टे-**१/**कक्ष-**८**अ/१०९९ दि.०८/१०/**२०१७

प्रस्तावना:-

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत एकूण १०५१ मंजूर पदे कार्यरत आहेत. त्यापैकी १५१ पदे वरील वाचा येथील अनु.क्र.४ येथे नमुद दि.१८ मे, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्थायी करण्यात आली आहेत. तसेच ६९० पदे वरील वाचा येथील अनु.क्र.५ येथे नमुद दि.१८ मे, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्थायी करण्यात आली आहेत. उर्वरीत २१० अस्थायी पदे वरील अनु.क्र.६ येथे नमुद दि.२८ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.०२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आली होती. राष्ट्रीय कार्यक्रमांतर्गत कार्यरत २१० अस्थायी पदे ही वरील अनु.क्र.३ येथे नमुद शासन निर्णयान्वये मंजुरी दिलेल्या सुधारीत आकृतीबंधातील आहेत. सदर २१० अस्थायी पदांचे कामकाजाचे स्वरुप,गरज व महत्व लक्षात घेता,या पदांना दि.०१.१०.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर कालावधीत सुधारीत आकृतीबंध मंजूर करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहुन मुदतवाढ देण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत कार्यरत २१० अस्थायी पदे (सोबतच्या विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे) राज्यातील जनतेला आरोग्य विषयक सेवा सातत्याने उपलब्ध करुन देत असल्याने या पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि. २८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णायाद्वारे मुदतवाढ दिलेल्या अस्थायी पदांवरील खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षातून सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१-नागरी आरोग्य सेवा विषम चिकित्सा
११०-रुग्णालये व दवाखाने
११० (२) मुफसल रुग्णालय व दवाखाने
(०१)(०१) मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने
(अंधत्व नियंत्रण) (२२१० ०१४६)

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन क्रमांकः **पदनि-२०१६/प्र.क.८/१६/आ.पु.क. दि. ०७ सप्टेंबर, २०१८** अन्वये विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२४११३३२८०३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Balkrishna Sadikale

Digitally signed by Ashok Balkrishna Sadikale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bf4abca9cffe245f125a15e04c04845 88caf62e835869fb4d6f50064ebdcd69, serialNumber=fabaff613511cd50155bfbc69dd 29512e15f759a310be8ca8cb9522ad27ed9b9, cn=Ashok Balkrishna Sadikale
Date: 2018.10.24 12:09:42 +05'30'

**(अ.बा.सादिकले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (नेत्र), मुंबई.
३. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व मंडळे).
५. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व).

६. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व).
७. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग, व्यय-१३, वि.सु.-१, सेवा-३, अर्थसकल्प-९, मंत्रालय, मुंबई.
१२. सार्वजनिक आरोग्य विभाग, अर्थसंकल्प शाखा, सेवा-१, सेवा-५, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-५).